**मंत्रालय विस्तार इमारतीतील चौरस आहारगृहातील महानगर गॅस लिमीटेडव्दारे पाईपलाईन जोडणीच्या कामास प्रशासकीय मंजुरी देण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग (उपाहारगृहे)**
**शासन निर्णय क्रमांक : आस्था-२०१६/प्र.क्र.५२/१६/मंउका,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०४ फेब्रुवारी, २०१७

**प्रस्तावना :**

सामान्य प्रशासन विभागाच्या अधिपत्याखाली मंत्रालय विस्तार इमारतीमधील चौरस आहारगृहात खाद्यपदार्थ तयार करण्यासाठी एलपीजी सिलेंडरमधून गॅसचा पुरवठा केला जातो. राज्य शासनाचे मुख्यालय असलेले मंत्रालय सर्वांगाने सुरक्षित असण्याच्या दृष्टीने चौरस आहारगृहाच्या वापरात असलेले एलपीजी सिलेंडर ऐवजी महानगर गॅस लिमिटेड यांचे मार्फत पाईपलाईनद्वारे गॅस पुरवठा करण्यासाठी गॅस पाईपलाईन जोडणीचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

सामान्य प्रशासन विभागाच्या अधिपत्याखाली मंत्रालय विस्तार इमारतीमधील पोटमजल्यावर चौरस आहारगृह येथे चालविण्यात येते. चौरस आहारगृहात खाद्यपदार्थ तयार करण्यासाठी सद्यस्थितीत एलपीजी सिलेंडर गॅसचा वापर करण्यात येतो. राज्य शासनाचे मुख्यालय असलेले मंत्रालय सर्वांगाने सुरक्षित असणे आवश्यक आहे ही बाब विचारात घेऊन मंत्रालय विस्तार इमारतीमधील चौरस आहारगृहासाठी महानगर गॅस लि. यांचेकडून पाईप लाईनद्वारे गॅस पुरवठा (PNG) करून घेण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुसार महानगर गॅस लिमिटेडमार्फत पाईप लाईनद्वारे गॅस पुरवठा करण्यात येणार असून महानगर गॅस लिमिटेड कंपनी त्यांच्या मुख्य गॅस पाईपलाईन पासून उपाहारगृहासाठी बसविण्यात येणाऱ्या गॅस मीटर पर्यंतचे काम करणार आहे तसेच त्यांनी बसविलेल्या गॅस मिटरपासून उपाहारगृहामधील स्वयंपाकगृहातील गॅस शेगडयांपर्यन्त गॅस पुरवठा करण्यासाठी लागणारी पाईप लाईन व इतर अनुषंगिक कामे महानगर गॅस लिमीटेड यांच्या कडील नोंदणीकृत कंत्राटदारांकडून करुन घ्यावयाची आहेत. त्यानुसार मंत्रालय विस्तार इमारतीमधील चौरस आहारगृहाला पाईपलाईनव्दारे गॅस पुरवठा करण्यासाठी करण्यात यावयाच्या कामाच्या रु. ४०.०० लक्ष इतक्या अंदाजित खर्चास मंजूरी देण्यात येत आहे.

२. वरील बाबीकरीता होणारा खर्च मागणी क्रमांक-ए-४, २०७५-संकीर्ण सर्वसाधारण सेवा १०८-उपाहारगृह भांडार विभाग, (००)(०२) चौरस आहार उपाहारगृहे योजना (२०७५०१४२) (दत्तमत)(योजनेत्तर), १३-कार्यालयीन खर्च मधुन भागविण्यात यावा.

३. सदरचा खर्च करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून महाव्यवस्थापक, मंत्रालय उपाहारगृहे यांना घोषित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१७०२०६१७३६३४९९०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Imtiyaz
Mushtaque Kazi

Digitally signed by Imtiyaz Mushtaque Kazi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=711589caceff9b0bb07e3c6556e724501d0c5ea5c63b3146314d51ec0e87d0a6, cn=Imtiyaz Mushtaque Kazi
Date: 2017.02.06 17:39:07 +05'30'

**( इ.मु.काझी )**
**सह सचिव**
**सामान्य प्रशासन विभाग (उपाहारगृहे)**

**प्रत :**

१. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२. महालेखाकार-१, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई
३. महालेखाकार-१, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई
४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
५. उप सचिव ,वित्त विभाग, व्यय-४, मंत्रालय, मुंबई
६. उप सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग(इमारती-३) मंत्रालय, मुंबई
७. महाव्यवस्थापक, मंत्रालय उपाहारगृहे
८. सहा. लेखा अधिकारी/ उलेपा चौआगृ
९. निवड नस्ती.